**<u>वित्तिय अधिकार नियमपुस्तिका,१९७८ (भाग-दुसरा)</u>**
**गृह विभागातील जिल्हा स्तरावरील पोलीस अधिक्षक/**
**पोलीस उपअधिक्षक यांना संक्षिप्त देयकावर रक्कम**
**आहरीत करण्यास वित्तीय अधिकार प्रदान करणे---**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-३११३/प्र.क्र.६८१/पोल-५ अ**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०३ ऑगस्ट, २०१७.

**<u>संदर्भ:</u>**- (१) शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक:संकीर्ण-३११३/प्र.क्र.६८१/पोल-५ अ, दिनांक २२ ऑगस्ट,२०१३.
(२) शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक:संकीर्ण-३११३/प्र.क्र.६८१/पोल-५ अ, दिनांक २६ जून,२०१४.
(३) अपर पोलीस आयुक्त (गुन्हे) यांचे कार्यालय,मुंबई यांच्या क्रमांक: ५०२८/ अपोआ/गुन्हे/प्रअ/१५, दिनांक १८-९-२०१५ चे पत्र.

**<u>प्रस्तावना:</u>**-

महाराष्ट्र पोलीस दलातील पोलीस अधिकारी/कर्मचारी यांना तपास कामासाठी कर्नाटक पोलीसांच्या धर्तीवर प्रवासभत्ता, दैनिक भत्ता व सर्वसाधारण खर्च साठी संक्षिप्त देयकावर अनुदान काढण्यास गृह विभागाच्या दिनांक २२ ऑगस्ट,२०१३ च्या निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. तसेच तपास कामासाठी करावयाच्या तपासखर्चाची योजना कायमस्वरुपी राबवावयाची असल्याने, वित्तिय अधिकार प्रदान समितीच्या शिफारशीवरुन जिल्हा स्तरावरील पोलीस अधिक्षक, पोलीस उपअधिक्षक,कार्यालय प्रमुख यांना शासन निर्णय दिनांक २६ जून, २०१४ सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये दर्शविल्याप्रमाणे विहित अटींची पूर्तता करण्याच्या आणि वित्तिय मर्यादेच्या अधीन राहून, वित्तीय अधिकार (भाग-दुसरा) अन्वये संक्षिप्त देयकावर रक्कम आहरीत करण्यास अधिकार प्रदान करण्यांत आलेले आहेत. सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टातील स्तंभ-७ मधील अट क्रमांक ११ मध्ये नवीन चौदा बाबींचा समावेश करण्यांची  बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

जिल्हा स्तरावरील पोलीस अधिक्षक, पोलीस उपअधिक्षक, कार्यालय प्रमुख यांना शासन निर्णय दिनांक २६ जून,२०१४ अन्वये जोडलेल्या परिशिष्टामध्ये दर्शविल्याप्रमाणे विहित अटींची पूर्तता करण्याच्या आणि वित्तिय मर्यादेच्या अधीन राहून, वित्तीय अधिकार (भाग-दुसरा) अन्वये अधिकार प्रदान करण्यांत आलेले आहेत. सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टातील स्तंभ-७ मधील नमूद बाबींसह अट क्रमांक ११ मध्ये पुढील बाबींचा सुध्दा समावेश करण्यांस शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

(एक)-परदेशात पाठविण्यासाठी लेटर रोगेटरीसाठी ट्रान्सलेशन फी

(दोन)-शासकीय/खाजगी (ज्या ठिकाणी शासकीय सेवा उपलब्ध होऊ शकत नाही अशा तातडीच्या वेळी) फॉरेन्सिक लॅबोरेटरी तपासणी अहवाल फी

(तीन)-शासकीय फॉरेन्सिक लॅबोरेटरीमध्ये सुविधा नसलेल्या तपास यंत्रणेच्या बाबतीत खाजगी तज्ञांची सेवा उपलब्ध करुन घेण्यासाठी त्यांना देय असणारी फी

(चार)-सायबर इन्वेस्टिगेशनसाठी लागणारे साहित्य उदा-संगणक, प्रिंटर्स, लॅपटॉप, एल.ई.डी., कॅमेरा,हार्डडिस्क

(पाच)- मोबाईल क्लोनिंगमध्ये लागणारे साहित्य खरेदी खर्च

(सहा)- क्लिष्ट स्वरुपाच्या आर्थिक गुन्हयांमध्ये फॉरेन्सिक अकाऊंटींग सॉफटवेअर खरेदी

(सात)- व्हॉईस सॅम्पलिंग रेकॉर्डिंगसाठी लागणारे साहित्य खरेदी

(आठ)- क्राईम सीन प्रिझर्व्हेशनसाठी लागणारे साहित्य खरेदी

(नऊ)-न्यायालयीन दाव्यासंदर्भात सादर करावयाच्या कागदपत्रांच्या व चार्जशीटच्या झेरॉक्स प्रती खरेदी

(दहा)-न्यायालयीन दाव्यासंदर्भात न्यायालयाच्या आदेशानुसार वेगवेगळया राष्ट्रीय व विदेशी भाषेतील भाषांतर खर्च

(अकरा)- गुन्हे तपास कामासाठी खाजगी मोटार वाहन भाडे तत्वावर घेणे

(बारा)-गुन्हयांच्या ठिकाणी तपास कामासाठी तातडीने लागणारी लेखनसामुग्री खरेदी (उदा.डिजीटल व्हिडीओ डिस्क, यु.एस.बी.,पेन ड्राईव्ह, झेरॉक्स पेपर, रबर ग्लोज, प्लॅस्टिक बॅग, पॉलीथिन बॅग आणि तदअनुषंगिक आवश्यक अन्य बाबी इ.)

(तेरा)- बाल अपचारी (विधी संघर्ष), हरविलेल्या व्यक्ती, मुले व मुली यांना त्यांच्या राहत्या गावी पोहोचविण्यासाठी लागणारा प्रवास, चहा-पान, भोजन व हॉटेल वास्तव्य खर्च

(चौदा)-गुन्हे तपासाअंतर्गत जप्त केलेल्या मुददेमालांच्या वाहतूकीवरील खर्च

२. सदर शासन निर्णयातील वित्तिय अधिकार तसेच इतर अटी व शर्ती आहेत तशाच लागू राहतील.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक: सं.क्र.५२०/ २०१६/ विनियम, दिनांक १५-४-२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०८०४१६०५५५८६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

V. M. Bhat

Digitally signed by V. M. Bhat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, cn=V. M. Bhat
Date: 2017.08.04 15:56:55 +05'30'

**( व्यं.मा.भट )**

उप सचिव, गृह विभाग

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई
२) पोलीस महासंचालक,लाचलुचपत प्रतिबंधक विभाग,महाराष्ट्र राज्य,मुंबई
३) अपर पोलीस महासंचालक,प्रशिक्षण व खास पथके,महाराष्ट्र राज्य,मुंबई
४) अपर पोलीस महासंचालक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य,मुंबई
५) अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग,पुणे

६) विशेष पोलीस महानिरीक्षक,फोर्स वन,मुंबई

७) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी,नाशिक

८) आयुक्त,राज्य गुप्तवार्ता विभाग,महाराष्ट्र राज्य,मुंबई

९) सर्व पोलीस आयुक्त

१०) सर्व परिक्षेत्रीय विशेष पोलीस महानिरीक्षक

११) सर्व पोलीस अधिक्षक

१२) महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा)मुंबई/नागपूर

१३) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)मुंबई/नागपूर

१४) अधिदान व लेखाधिकारी ,मुंबई

१५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई

१६) संबंधित कोषागार अधिकारी

१७) कक्ष अधिकारी (व्यय-७/विनियम),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई

१८) निवडनस्ती/का-पोल-५ अ.